राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) योजनेअंतर्गत अंमलबजावणीकरिता सन २०२०-२१ च्या अनुसुचित जमातीचा अखर्चित निधी पुर्नजिवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देवून निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राशेअ-४४२१/प्र.क्र.१५७/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ६ डिसेंबर, २०२१

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना
२. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक ०३१७/प्र.क्र. १८/राकृवियो कक्ष, दि. १३.०४.२०१७
३. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-१/२०२०-RFS-III, दिनांक १२.०४.२०२१
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-१/२०२०-RFS-III, दिनांक ६.७.२०२१
५. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक शाशेअ ४४२१/प्र.क्र. ८२/८-अे, दि. २९.७.२०२१
६. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआआ-२०२१/कोक्षेवि/निधीपृवि/र-१६६, दि.२३.९. २०१९
७. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी २०२१/प्र.क्र. ७/कार्यासन-६, दि. १.१२.२०२१

**प्रस्तावना**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास [Rain fed Area Development (RAD)] योजनेची अंमलबजावणी करण्यात येत आहे. त्याकरिता केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे. सन २०२०-२१ या वर्षासाठी केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी रु. १५६९.४२ लाख एवढा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी र १३७०.८६ लाख एवढा निधी खर्च झाला असून रु. १७६.८५ लाख निधी दिनांक १ एप्रिल, २०२१ रोजी अखर्चित आहे. तसेच रु. २१.७१ लाख इतका निधी करोनाच्या पार्श्वभूमिवर वितरीत करण्यात आला नव्हता. सदर अखर्चित निधी तसेच अवितरीत निधी सन २०२१-२२ या वर्षात खर्च करण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन दिनांक १२ एप्रिल, २०२१ च्या पत्रान्वये पुनरुज्जीवित करुन दिलेला आहे.

उपरोक्त अखर्चित निधीमध्ये अनुसूचित जमातीचा केंद्र हिश्श्याचा रु. ८२.०२ लाख व राज्य हिश्श्याचा रु. ५४.७० लाख असा एकूण रु. १३६.७२ लाख निधी सन २०२१-२२ या वर्षात पुनरुज्जीत करुन आदिवासी विकास विभागाने संदर्भाकित क्र. ७ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे. सदर निधी आयुक्त (कृषि) यांना वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता अंमलबजावणी करण्यासाठी सन २०२०-२१ या वर्षातील केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी रु. ८२.०२ लाख (रुपये ब्याऐंशी लाख दोन हजार फक्त) व राज्य हिस्सा रु. ५४.७० लाख (रुपये चौपन्न लाख सत्तर हजार फक्त) असा एकूण रु. १३६.७२ लाख (रुपये एक कोटी छत्तीस लाख बहात्तर हजार फक्त) सन २०२१-२२ या वर्षात खर्च करण्यासाठी वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रु. १३६.७२ लाख निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदर खर्च सन २०२१-२२ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| **मागणी क्र.टी-५,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१)(१९) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती सनियंत्रण, प्रतीमानकरण व नेटवकिंग कार्यक्रम (केंपुयो)<br>(केंद्र हिस्सा-६०%)<br>(अनुसूचित जमाती)(२४०१ ए ५३९)<br>३३ अर्थसहाय्य. | **मागणी क्र.टी-५,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१)(२०) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती सनियंत्रण, प्रतीमानकरण व नेटवकिंग कार्यक्रम<br>(केंपुयो) (राज्य हिस्सा-४०%)<br>(अनुसूचित जमाती) (२४०१ ए ५४८)<br>३३ अर्थसहाय्य. |

३. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिश्श्याच्या रू.१३६.७२ लाख निधीचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरीता संचालक संचालक (विस्तार व प्रशिक्षण ) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हानिहाय वाटप करावयाचा निधी BDS प्रणालीद्वारे विभागीय कृषि सहसंचालकांमार्फत जिल्हयांना वितरीत करावा व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना प्राप्त निधी आहरित करुन PFMS खात्यावर जमा करावा व संपूर्ण अदायगी PFMS वरच करावी.

४. या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या रू.१३६.७२ लाख निधीचे सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने, निधी आहरण व संवितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संतिरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

५. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी राज्य शासनास सन २०२१-२२ करीता मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

६. सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांमधील अवर्षण प्रवण क्षेत्र घटकाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तसेच संदर्भाधीन अ.क्र. २ येथील उन्नत शेती समृद्ध शेतकरी अभियानाच्या दिनांक १३.०४.२०१७ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात यावी.

७. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

८. योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी व सहकार विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

९. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सूचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

१०. अनुसूचित जमाती प्रवर्ग साठीचा निधी अनुसूचित जमाती लाभार्थ्यांकरीता खर्च करण्यात यावा.

११. अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना योजनेचा लाभ कोणत्या स्वरुपात देण्यात आला, याबाबतची सन २०१९-२०२० तसेच सन २०२०-२१ या वर्षातील माहिती आदिवासी विकास विभागास सादर करण्यासाठी, शासनास सादर करण्यात यावी.

१२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र. ६४/अर्थ-३, दि. १६.०४.२०२१ व अर्थसं-२०२१/प्र.क्र. ७८/अर्थ-३, दि. २०.७.२०२१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन तसेच संदर्भाधीन अ.क्र. ७ येथील आदिवासी विकास विभागाच्या दिनांक १.१२.२०२१ च्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०६१६५४४७०७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2021.12.06 16:55:58 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे

७. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल ,पुणे)
११. सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/सर्व मंडळ कृषि अधिकारी
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१४. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१६. सहायक संचालक(लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१७. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी
१८. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१९. उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२०. सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२१. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
२२. आदिवासी विकास विभाग (का.६), मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती ८-अे